राज्यातील आठ कारागृहामध्ये स्वयंपाकगृहात
.सुधारणा करुन लाकडाऐवजी गॅसचा वापर
करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- बीएलडी १०९९/प्र.क्र.३९/पीआरएस-२.**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :-१० जुलै, २००२.**

पहाः- १) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक- बीएलडी/५०५/स्वयंगृह गॅस ९८/कक्ष-३,दिनांक १८ नोव्हेंबर ९९.

२)नियोजन विभाग,शासन निर्णय,क्र.अविआ २०००/प्र.क्र.९६/१४१४; दिनांक १५ मे, २००१.

**शासन निर्णयः-** राज्यातील सर्व कारागृहामध्ये कैदयांना स्वयंपाक बनविण्यासाठी लाकडाचा वापर करून कैदयांचे जेवण तयार केले जाते. लाकडावर स्वयंपाक करण्यासाठी सात ते आठ तासाचा कालावधी लागतो. त्यामुळे कैदयांना रुचकर व गरम अन्न मिळत नाही. या शिवाय जळणाऱ्या लाकडाची उष्णता व धूर यामुळे कैदयांच्या आरोग्यास अपाय होत आहे. तसेच लाकडाच्या धुरामुळे कारागृहातील हवामान प्रदुषित होत आहे.त्याकरिता कारागृहात लाकडाऐवजी स्वयंपाकासाठी गॅसचा वापर केल्यास वरील सर्व त्रासापासून बचाव होईल व कैदयांना वेळेवर रुचकर अन्न दयावयास मिळेल.शिवाय गॅसचा वापर आर्थिक दृष्टया फायदेशीर असल्याने कारागृह महानिरीक्षक महाराष्ट्र राज्य पुणे यांचेकडून **राज्यातील येरवडा मध्यवर्ती कारागृह,मुंबई मध्यवर्ती कारागृह,औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह, नाशिक रोड मध्यवर्ती कारागृह,कोल्हापूर मध्यवर्ती कारागृह,अमरावती मध्यवर्ती कारागृह,ठाणे मध्यवर्ती कारागृह व कल्याण जिल्हा कारागृह या आठ कारागृहात** स्वयंपाकगृहात सुधारणा करून लाकडाऐवजी स्वयंपाकासाठी गॅसचा वापर करण्यास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत प्रस्ताव प्राप्त झाला असून सदर प्रस्तावात वर नमूद कारागृहात स्वयंपाकगृहासाठी शेड बांधणे,स्वयंपाकाचा ओटा बांधणे, गॅसची पाईप लाईन, गॅसची शेगडी, गॅस सिलेंडर इत्यादी साधनसामुग्री खरेदी करण्याचे प्रस्तावित असून प्रत्येक कारागृहासाठी रु. १०/-लक्ष इतका खर्च येणार असल्याने वर नमूद आठ कारागृहासाठी एकूण रु. ८०/- लक्ष खर्च होणार आहे. या खर्चास वित्तिय मान्यता धरुन प्रशासकीय मान्यता दयावी अशी कारागृह महानिरीक्षकांनी शासनास विनंती केली आहे.

२. तुरुंग प्रशासनातंर्गत कारागृहात सुधारणा करण्याकरिता केंद्र शासनाच्या ११ व्या वित्त आयोगाने राज्यास सन २०००-२००५ या पाच वर्षाच्या कालावधीकरिता रु. आठ कोटीचे अनुदान मंजूर केले असून त्यापैकी रु.८०.४४/- लक्ष अनुदान राज्यास प्राप्त झालेले आहे.केंद्रीय वित्त

आयोगाने राज्यास मंजूर केलेले वर नमूद अनुदान प्राप्त करून घेण्याकरिता पाठविलेल्या प्रस्तावामध्ये स्वयंपाकगृहात सुधारणा व गॅसचा वापर या बाबींचा समावेश असल्याने व त्या बाबीसाठी केंद्रीय वित्तिय आयोगाचा आक्षेप नसल्याने सदर बाबीवरील खर्च केंद्रीय वित्त आयोगाकडून राज्यास प्राप्त झालेल्या अनुदानातून भागविणे शक्य आहे. या सर्व बाबी विचारात घेऊन कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास सादर केलेल्या वरील प्रस्तावास प्रशासकीय मान्यता या शासन आदेशाद्वारे मंजूर करण्यात येत आहे.

४. यासाठी होणारा खर्च सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मागणी क्र.एच-८ " मुख्य लेखाशिर्ष " ४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च १०१, बांधकाम-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-प्रमुख बांधकामे (००) (१०) (तुरुंग) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व आर्थिक वर्ष २००२-२००३ मध्ये उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच या प्रस्तावातील खरेदी विहित पध्दतीने करण्यात यावी.

५. हा शासन निर्णय नियोजन विभाग,सार्वजनिक बांधकाम विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७/२००२/विआ / दिनांक २९.६.२००२ अन्वये निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(स्वाक्षरी)

( र. ना. माळी. )
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रति,
अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक ,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक,दक्षिण विभाग,मुंबई/मध्य विभाग,औरंगाबाद/पश्चिम विभाग,नाशिक/ पूर्व विभाग,नागपूर.
अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह,येरवडा,पुणे/मुंबई/औरंगाबाद/नाशिक/कोल्हापूर /अमरावती/ ठाणे
अधीक्षक, कल्याण जिल्हा कारागृह,कल्याण.
महालेखापाल,महाराष्ट्र -१ /२ ( लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई/नागपूर
महालेखापाल,महाराष्ट्र -१ /२ ( लेखा परीक्षा ) मुंबई/नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे / पुणे/ औरंगाबाद/नाशिक/कोल्हापूर/अमरावती
अवर सचिव,गृहविभाग (बीयुडी-१)
उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, (इमारती-२) मंत्रालय, मुंबई.
नियोजन विभाग ( कार्यासन १४११) मंत्रालय,मुंबई.
वित्त विभाग (व्यय-८) मंत्रालय,मुंबई.
निवडनस्ती- पीआरएस-२.